**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) या कंपनीस सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) साठी निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## इतर मागास बहुजन कल्याण विभाग
**शासन निर्णय क्रमांक : सारथी २०१९/प्र.क्र.११७/महामंडळे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०२०

<u>संदर्भ</u> :- १. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०
२. वित्त विभाग शासन परिपत्रक,क्र. अर्थस-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२०
३. नियोजन विभाग शासन आदेश क्र.सारथी २०२० /प्र.क्र.४२/का.१४२५ दि. १५/१०/२०२०
४.नियोजन विभाग शासन आदेश क्र.सारथी २०२० /प्र.क्र.४४/का.१४२५ दि.१५/१०/२०२०

### शासन निर्णय

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), या कंपनीस सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) साठी रु. ३८.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीमधून छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी ), या कंपनीस रु. ११.४० कोटी (अकरा कोटी चाळीस लाख रुपये फक्त ) इतके सहायक अनुदान (वेतनेत्तर) खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), या कंपनीचे "मेमोरेन्डम ऑफ असोसिएशन" प्रमाणे संचालक मंडळाकडून मान्यता देण्यात येणारे उपक्रम व कल्याणकारी योजनावर निधी खर्च करता येईल.

(२) छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), या कंपनीव्दारे राबविण्यात येणारे उपक्रम व कल्याणकारी योजनासंदर्भात होणाऱ्या निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक व मुख्य लेखा वित्तीय अधिकारी हे संयुक्तरित्या सादर करतील.

२. इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे, सह सचिव (अर्थसंकल्प) हे नियंत्रक अधिकारी राहतील. तसेच छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), या कंपनीचे मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी यांनी ही रक्कम कोषागार कार्यालय, पुणे मधून "आहरण व वितरण अधिकारी " म्हणून आहरीत करावी. त्यांना सदर अनुदान महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ च्या नियम ४४ मधील नमुन्यातील देयकान्वये संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.या बाबीवरील खर्च " मागणी क्र.झेडजी-३, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे

कल्याण, ०३, मागासवर्गाचे कल्याण, १०२ आर्थिक विकास,(०१) विजाभज, इमाव व विशेष मागास प्रवर्ग यांचे कल्याण, (०१) (०७) छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (२२२५ एफ ३४३) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर ) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदींतून भागविण्यात यावा.

३. नियोजन विभाग शासन आदेश क्र.सारथी २०२० /प्र.क्र.४४/का.१४२५ दि.१५/१०/२०२० व नियोजन विभाग शासन आदेश क्र.सारथी २०२०/प्र.क्र.४२/का.१४२५ दि.१५/१०/२०२० प्रमाणे छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), या कंपनीला निधी वितरीत झाल्यावर व्यवस्थापकीय संचालक, यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली निधीच्या विनियोगाबाबत सर्व अभिलेख ठेवण्याची जबाबदारी कंपनीचे मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी यांची राहिल.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०२० /प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.४८७/व्यय-१४ व दिनांक ३०/०९/२०२० प्रमाणे व नियोजन विभागाच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२८१०५७१३१३२२ असा आहे. हे शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

JAGTAP AJIT RAMESH

Digitally signed by JAGTAP AJIT RAMESH
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=1c57e2746855b8b01d38f9cbd79dc87f2af58135cf485d243d93ebf54c900920, serialNumber=62896254f9fecc7da7b3ba8fdc28bab4a5c1238d1090c223fd8574f24ba7ca52, cn=JAGTAP AJIT RAMESH
Date: 2020.10.28 11:01:46 +05'30'

**(अजित जगताप)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सह सचिव / उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग (का.व्यय-१४ अर्थसंकल्प-३),मंत्रालय, मुंबई
७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
८.संशोधन अधिकारी, राज्य मागासवर्ग आयोग, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. निवडनस्ती.